**"अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास" रु.१३.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र. अपाम- २०२२/प्र.क्र.१२०/का.१४२५**
**मंत्रालय विस्तार कक्ष क्र.६५१,सहावा मजला ,**
**मादाम कामा रोड, राजगुरू हुतात्मा चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक - २३ मार्च, २०२३**

वाचा :१) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई यांचे पत्र क्र. एपीएमएम/एडीएम/९०१/२०२२ दि.२१/०२/२०२३.
२) सामान्य प्रशासन विभाग यांची अधिसूचना क्र. शाकानि-२०२१/प्र.क्र.१५५/१८(रवका), दि.०९.०९.२०२१.
३) शासन समक्रमांक दि.०८-०७-२०२२ , २४ नोव्हेंबर २०२२ व दिनांक ६-०२-२०२३ चा शासन निर्णय

**प्रस्तावना :**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाच्या १) वैयक्तिक व्याज कर्ज परतावा योजना (IR-I) गट कर्ज व्याज परतावा योजना (IR-II) या योजनांच्या सुयोग्य अंमलबजावणी करिता रु.२७५.०० कोटीचे दायित्व (Liability) लाभार्थ्यांप्रती महामंडळाचे आहे व हे दायित्व कालानुरूप वाढत्या स्वरुपाचे आहे. सन २०२२-२३ साठी अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास रु.१००.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत केला आहे. त्याअनुषंगाने शासन समक्रमांक दिनांक ८/०७/२०२२, ४/११/२०२२ व ६/०२/२०२३ अन्वये अनुक्रमे रु. ३०.०० कोटी, रु.१२.०० कोटी व रु.२५.०० कोटी असा एकुण रु.६७.०० कोटी अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास निधी वितरीत करण्यात आलेला आहे. आता चालू आर्थिक वर्षातील सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उर्वरित निधी उपलब्ध करून देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास सन २०२२-२३ साठी अर्थसंकल्पित केला आहे. सुधारित अंदाजानुसार रु. ८०.०० कोटी इतकी तरतूद उपलब्ध आहे. यापूर्वीच रु. ६७.०० कोटी इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे. आता रु.१३.०० कोटी इतका निधी अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळास या शासन निर्णयान्वये वितरित करण्यात येत आहे.

सदरचा निधी अंतर्गत होणारा खर्च अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने खालील लेखाशीर्षामधून भागवावा.

**लेखाशिर्ष :**

मागणी क्र. ओ -१०

४२५० इतर सामाजिक सेवा यावरिल भांडवली खर्च

२- (००) १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका

(००) (०१) अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित, मुंबई

(०१) भांडवली अंशदान कार्यक्रम/दत्तमत

(०२)-संगणक सांकेतांक क्रमांक (४२५० ० अे ०७२) ३२, अंशदाने

२. प्रस्तुत अनुदान वितरित करण्यासाठी “नियंत्रक अधिकारी” म्हणून उपसचिव (रोखशाखा) नियोजन विभाग, मंत्रालय व “आहरण व संवितरण अधिकारी” म्हणून कक्ष अधिकारी (रोखशाखा) नियोजन विभाग, मंत्रालय यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

३. अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळाने नमूद उद्दिष्टाकरिता खर्च करण्याची दक्षता द्यावी .

४. शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रं.१२४/२०२३/व्यय-८ दि.१३/०३/२०२३ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अधीन राहून हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

५. महाराष्ट्र शासनाच्या www.maharastra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०२३०३२३१३१३५४०९१६ असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by VIDHYADHAR MAHADEV BORKAR
Date: 2023.03.23 13:35:17 +05'30'

**(वि.म. बोरकर)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
२. महालेखापाल (लेखापरीक्षा), एक/दोन, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई

४. व्यवस्थापकीय संचालक, अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ मर्यादित मुंबई.

५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी मुंबई.

६. सह सचिव (कार्यासन व्यय-८ व अर्थ-१६ ), वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई.

७. उप सचिव (का.१४११,१४२१,१४२२,१४२३, व १४२४ ), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई.

८. अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय , मुंबई.

९. कक्ष अधिकारी (का.१४२४), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०. सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.

११. निवडनस्ती (का.१४२५)